राज्य कामगार विमा योजने अंतर्गत आयुक्त कार्यालय, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांचे आस्थापनेवरील मंजूर २९ अस्थायी पदे दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबत....

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

### शासन निर्णय क्रमांक : राकायो-२०२४/प्र.क्र.२८/राकावि-२

गोकूळदास तेजपाल रुग्णालय आवार,१० वा मजला, बि विंग
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक :२८मार्च, २०२४

**वाचा -**

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. असंक-१००४/ प्र.क्र.१२ (भाग-२) / २००४/वित्तीय सुधारणा-१, दि.४ ऑक्टोंबर, २००४.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक राकायो-१५०२ / प्र.क्र.२ / २००२/ राकावि-२, दिनांक ०१.१०.२००७.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. राकायो - २०२३/ प्र.क्र.१४२/राकावि-२, दि. २० सप्टेंबर, २०२३.
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४.
५) संचालक (प्रशासन), राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांचे पत्र क्र. आयुक्त/ राकावियो/अस्थायी पदे पुढे चालू ठेवणे/का.क्र.३/३९०२/२०२४, दि.२९ फेब्रुवारी, २०२४.

**प्रस्तावना -**

संदर्भांकित अ. क्र. २ येथील शासन निर्णयामधील आदेशान्वये राज्य कामगार विमा योजने अंतर्गत पदांच्या सुधारीत आकृतीबंधाना मंजूरी देण्यात आलेली असून त्यानुसार आयुक्त कार्यालय, राज्य कामगार विमा योजना, मुंबई येथील आस्थापनेवर २९ अस्थायी पदे मंजूर करण्यात आलेली आहेत. सदरील अस्थायी पदे संदर्भांकित अ.क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये दि.१.०९.२०२३ ते दि.२९.०२.२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आलेली आहे. सदरील सर्व २९ अस्थायी पदे दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंतच्या कालावधीसाठी पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई येथील आस्थापनेवरील खालील विवरणपत्रामध्ये दर्शविल्याप्रमाणे एकूण २९ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंतच्या कालावधीसाठी पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | ज्या शासकीय आदेशान्वये पदे निर्माण करण्यात आले त्या शासन आदेशाचा क्रमांक व दिनांक | पदांचे नाव | मंजूर करण्यात आलेल्या पदांची संख्या | वेतनश्रेणी | ज्या शासन आदेशान्वये पदे मागील वेळी सुरू ठेवण्यात आली त्या शासन निर्णयाचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | शासन निर्णय सा. आ. वि. मंत्रालय ,मुंबई क्र. रा का यो-१५०२ /प्र. क्र. २/२००२/ राकावि-२, दि.१/१०/२००७ | आयुक्त | ०१ | ३७४००-६७००० | शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. राकायो - २०२३/प्र.क्र.१४२/ राकावि-२, दिनांक २० सप्टेंबर, २०२३ |
| २. | वरीलप्रमाणे | संचालक (प्रशासन) | ०१ | १५६००-३९१०० | वरीलप्रमाणे |
| ३. | वरीलप्रमाणे | उपसंचालक (प्रशासन) | ०१ | १५६००-३९१०० | वरीलप्रमाणे |
| ४. | वरीलप्रमाणे | उपसंचालक (वैद्यकीय) | ०१ | १५६००-३९१०० | वरीलप्रमाणे |
| ५. | वरीलप्रमाणे | प्रशासन अधिकारी | ०३ | ९३००-३४८०० | वरीलप्रमाणे |
| ६. | वरीलप्रमाणे | लघुलेखक (निम्नश्रेणी) | ०१ | ९३००-३४८०० | वरीलप्रमाणे |
| ७. | वरीलप्रमाणे | अधिक्षक | ०१ | ९३००-३४८०० | वरीलप्रमाणे |
| ८. | वरीलप्रमाणे | सहायक लेखा अधिकारी | ०१ | ९३००-३४८०० | वरीलप्रमाणे |
| ९. | वरीलप्रमाणे | वरिष्ठ सहाय्यक | ०२ | ९३००-३४८०० | वरीलप्रमाणे |
| १०. | वरीलप्रमाणे | वरिष्ठ लिपिक | ०३ | ५२००-२०२०० | वरीलप्रमाणे |
| ११. | वरीलप्रमाणे | कनिष्ठ लिपिक | ०७ | ५२००-२०२०० | वरीलप्रमाणे |
| १२. | वरीलप्रमाणे | टंकलेखक | ०१ | ५२००-२०२०० | वरीलप्रमाणे |
| १३. | वरीलप्रमाणे | सफाईगार | ०१ | ४४४०-७४४० | वरीलप्रमाणे |
| १४. | वरीलप्रमाणे | चतुर्थश्रेणी कर्मचारी | ०४ | ४४४०-७४४० | वरीलप्रमाणे |
| १५. | वरीलप्रमाणे | पहारेकरी | ०१ | ४४४०-७४४० | वरीलप्रमाणे |
| | | एकूण पदे | २९ | | |

०२. मंजूर पदांचा आढावा घेऊन सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्यासाठी आयुक्त, राकावियो कार्यालयाने प्रस्ताव सादर करणे आवश्यक आहे.

०३. या पदावरील खर्च, “मागणी क्रमांक आर-१, २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा-विषम चिकित्सा, १०२-राज्य कामगार विमा योजना, १०२-१-बृहन्मुंबईतील व मुफसल क्षेत्रातील राज्य कामगार विमा योजना, (०१)(०१)-आयुक्त, रा.का.वि. योजना, मुंबई (२२१० १३६७) (योजनेत्तर)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाच्या मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

०४. सदर खर्च राज्य शासन व राज्य कामगार विमा महामंडळ, नवी दिल्ली यांच्यात १: ७ या प्रमाणात विभागण्यात यावा. तसेच सदरहू खर्चाची प्रतिपुर्ती वेळीच राज्य कामगार विमा महामंडळाकडून मिळवून घेण्याची आयुक्तांनी दक्षता घ्यावी.

०५. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २१.०२.२०२४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

**०६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२७१५२४३७९९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHANDRAKANT HARIDAS WADE

Digitally signed by CHANDRAKANT HARIDAS WADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=7a8cb09a73bc92b24a171080ebd81893480c90bedd57685ea1ce3af533f64bce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9474E7143B2BC3FD96E8D7BF07D1CE51DE8461D4C34AE1E3F643C11B54523936, cn=CHANDRAKANT HARIDAS WADE
Date: 2024.03.28 13:20:47 +05'30'

**(चंद्रकांत ह. वडे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
२. संचालक ( प्रशासन/वैद्यकीय ), राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
३. सहाय्यक संचालक ( लेखा ), राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
४. महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. वैद्यकीय आयुक्त, राज्य कामगार विमा महामंडळ, पंचदीप भवन, कोटला रोड, नवी दिल्ली.
८. प्रादेशिक संचालक, राज्य कामगार विमा महामंडळ, पंचदिप भवन, ना.म.जोशी मार्ग, लोअर परेल, मुंबई-१३.
९. वित्त विभाग व्यय-१३, अर्थसंकल्प-१८, वित्तीय सुधारणा-१ मंत्रालय, मुंबई.
१०.अवर सचिव (अर्थसंकल्प/सेवा-१) सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११.निवडनस्ती (राकावि-२).